GR - 20040811161572002 2 402

इन्फॉरमल सेक्टरमधून कामगारांची कौशल्य परीक्षा घेऊन त्यांना प्रमाणपत्र देणे.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकआयटीआय-१००२/प्र.क्र.३५७/व्यशि-२**
**मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- २७ ऑक्टोबर, २००३**

**पहा:-१) डीजीईटीचे दिनांक ३१-५-२००२ चे पत्र क्रमांक डीजीईटी-३५(४२)(२०)/२००१- पीसीटी**

**प्रस्तावना:-** विविध उद्योगधंदे /कारखाने यामध्ये काम करणारे कारागीर अशिक्षित अथवा कमी शिकलेले असले तरी ते आपआपल्या कामात अतिशय कुशल असतात. तथापि त्यांच्याकडे त्यांच्या कुशलतेबाबतचे कोणतेही प्रमाणपत्र नसल्यामुळे त्यांना देशात अगर परदेशात त्यांच्या कामाच्या दर्जानुसार काम उपलब्ध होत नाही. अथवा त्याप्रमाणात वेतनही मिळत नाही. अशा कामगारांची कौशल्य तपासणी करुन त्यांना प्रमाणपत्र देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** डीजीईटी च्या उपरोक्त संदर्भातील मार्गदर्शक सूचनेनुसार , प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे, कुशल कारागीरांची कौशल्य चाचणी घेऊन त्यांना प्रमाणपत्र देण्याबाबतचा निर्णय आता या शासन निर्णयान्वये शासनाने घेतला आहे. सुरुवातीला गवंडी, नळ कारागीर, मोटर मेकॅनिक या व्यवसायातील कामगारांसाठी ही योजना राबविण्यांत येणार आहे. त्यानंतर आवश्यकतेनुसार , नवीन व्यवसायांसाठी कौशल्य चाचणी घेऊन प्रमाणपत्र देण्याबाबतही टप्प्याटप्प्याने विचार करण्यांत येईल. ही योजना प्रथमतः राज्यस्तरावर व नंतर राष्ट्रीय स्तरावर राबविण्यांत येईल.

कौशल्य परिक्षेचे स्तर खालीलप्रमाणे राहतील.

१) प्रथम स्तर :- अशिक्षित कामगारांसाठी प्रात्यक्षिक चाचणी व तोंडी परिक्षा

२) द्वितीय स्तर :- कमी शिक्षित कामगारांसाठी प्रात्याक्षिक चाचणी व जुजबी थेअरी परिक्षा।

३) तृतीय स्तर :- शिक्षित कामगारांसाठी प्रात्यक्षिक परिक्षा व थेअरी परिक्षा (S.C.V.T. मार्फत )

प्रथम स्तर व द्वितीय स्तरावरील चाचणी करिता उत्तीर्णतेचे प्रमाणपत्र संबंधीत संस्थेचे प्राचार्य व संचालक ( प्रशिक्षण ) यांच्या स्वाक्षरीचे देण्यात येईल. तृतीय स्तरावरील परिक्षेकरिता S.C.V.T चे (राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद) प्रमाणपत्र देण्यात येईल. S.C.V.T ची परिक्षा उत्तीर्ण होणारा कारागीर हा पात्रतेच्या इतर अटी पूर्ण करीत असेल तर तो संबंधित व्यवसायाच्या N.C.V.T.(राष्ट्रीय व्यवसाय प्रशिक्षण परिषद) च्या परिक्षेस बसण्यास पात्र राहील.

कौशल्य चाचणीची सोय जिल्हा स्तरावरील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये करण्यात येईल. या परिक्षेचे स्वतंत्र वेळापत्रक दरवर्षी संचालक ( प्रशिक्षण ) यांच्याकडून निश्चित करण्यात येईल. सदर परिक्षेकरिता संबंधितांकडून पुढीलप्रमाणे शुल्क आकारण्यात येईल :-

| अ.क्र. | परिक्षेचे स्वरुप | प्रस्तावित शुल्क |
|---|---|---|
| १ | प्रथम स्तर चाचणी | रु. २००/- |
| २ | द्वितीय स्तर चाचणी | रु. २५०/- |
| ३ | तृतीय स्तर चाचणी | रु. ३००/- |

उपरोक्त प्रस्तावित शुल्काद्वारे जमा होणारा पैसा संस्थेच्या स्वीय प्रपंची खात्यात जमा करुन त्यातून परिक्षेचा व प्रशासकीय खर्च भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मनीषा शिंत्रे )
उप सचिव महाराष्ट्र शासन.

प्रत.
संचालक ( प्रशिक्षण ) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय ( सर्व )
प्राचार्य , औद्योगिक प्रशिक्षण संस्था ( सर्व )
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
महालेखापाल ( लेखापरिक्षा ) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
लेखा व अनुदान अधिकारी , मुंबई
निवडनस्ती ( व्यशि-२ )